**राज्यात संपूर्ण स्वच्छता अभियानातंर्गत दि. २ ऑक्टोबर, २०११ ते दि. ४ नोव्हेंबर, २०११ या कालावधीत स्वच्छता उत्सव राबविणेबाबत**

## महाराष्ट्र शासन

शासन परिपत्रक क्रं संस्वअ २०११/ प्र.क्र २४५/ पापु-१६
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांकः २६ सप्टेंबर, २०११

**वाचा :** मा. सचिव, ग्रामिण विकास मंत्रालय, पेयजल आणि स्वच्छता विभाग, भारत सरकार यांचे पत्र क्र. डब्ल्यु-११०२/१३/२०११/सीआरएसपी, दि. ९ ऑगस्ट, २०११ चे पत्र.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाने दि. २ ऑक्टोबर, २०११ ते दि. ४ नोव्हेंबर, २०११ या कालावधीत स्वच्छता उत्सवाचे आयोजन करण्याबाबत निर्देश देण्यात आलेले आहेत. या कालावधीत स्वच्छता कार्यक्रमासंदर्भाबाबत जाणीव जागृती निर्माण करणे आणि कार्यक्रमामध्ये लोकांचा सहभाग मिळून स्वच्छतेच्या विविध घटकांबाबत जागरुक होऊन गावस्तरावरील अंमलबजावणीमध्ये व संनियंत्रणामध्ये सक्रिय होतील या उद्दशाने विविध उपक्रमांचे आयोजन करण्याबाबत निर्देश देण्यात आलेले आहेत. या अंतर्गत केंद्रशासनाने सुचविलेल्या उपक्रम व त्याचबरोबर काही नाविन्यपूर्ण उपक्रम राबबिण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :**

या अनुषंगाने राज्यात दिनांक २ ऑक्टोबर २०११ ते ४ नोव्हेबर २०११ या कालावधीत ***'स्वच्छता उत्सव'*** राज्यातील सर्व ग्रामपंचायतीमध्ये राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या स्वच्छता उत्सवादरम्यान करावयाच्या नियोजन व उपक्रमातील बाबी खालीलप्रमाणे प्रस्तावित करण्यात येत आहेत. या बाबी प्रस्तावित करताना या कार्यक्रमाच्या माहिती, शिक्षण व संवाद विषयक उपक्रमांवर अधिक भर देण्यात आलेला आहे. दिनांक २ ऑक्टोबर ते ३१ डिसेंबर दरम्यान राज्यात संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान तथा राष्ट्रसंत तुकडोजी महाराज स्वच्छ ग्राम स्पर्धा घेतली जाते. तरी संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानामधील उपक्रम व स्वच्छता उत्सवातील उपक्रमाची एकत्रित सांगड घालुन अंमलबजावणी करण्यात यावी. स्वच्छता उत्सवामध्ये स्वच्छता क्षेत्रातील सद्यस्थितीतील शौचालयांची उपलब्धता व

त्याचा वापर, आरोग्य शिक्षण, शाळा व अंगणवाडीमध्ये स्वच्छतेच्या व्यवस्था व सांडपाणी व घनकचरा व्यवस्थापनाबाबत उपक्रमांचे आयोजन करुन गावांना निर्मल ग्राम पुरस्काराकडे वाटचाल करण्याच्या दृष्टीने प्रेरित करणे तसेच निर्मल ग्राम पुरस्कार प्राप्त झालेल्या ग्रामपंचायती शाश्वतपणे स्वच्छ राहणे अपेक्षित आहे.

**स्वच्छता उत्सवाची अंमलबजावणी**

स्वच्छता उत्सवाची अंमलबजावणी दि. २ ऑक्टोबर ते ४ नोव्हेंबर २०११ या कालावधीमध्ये राज्यातील सर्व ग्रामपंचायतीमध्ये करण्यात यावी.

**१. दिनांक १ ऑक्टोबर २०११ रोजी पत्रकार परिषदेचे आयोजन करणे**

स्वच्छता उत्सवाच्या प्रभावी शुभारंभ व अंमलबजावणीसाठी जिल्हा परिषचे अध्यक्ष यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक **१ ऑक्टोबर २०११** रोजी पत्रकार परिषदेचे आयोजन करण्यात यावे.

**२. स्वच्छता उत्सवाचा शुभारंभ**

जिल्हा व ग्रामपंचायतस्तरावर **दिनांक २ ऑक्टोबर २०११** रोजी स्वच्छता उत्सवाचा शुभारंभ करण्यात येईल. जिल्हास्तरावरील शुभारंभ हा मा. पालकमंत्री यांच्या हस्ते करण्यात यावा. यामध्ये जिल्हास्तरावर यावर्षी निर्मल ग्राम पुरस्कारासाठी प्रस्तावित ग्रामपंचायतीचे सरपंच यांना बोलविण्यात यावे.

**३. स्वच्छतादूत प्रशिक्षण कार्यक्रम**

जिल्हास्तरावर मास्टर स्वच्छतादूताचे प्रशिक्षण घेऊन त्याच्यामार्फ़त सर्व तालुक्यामध्ये प्रत्येक शाळेतील एक याप्रमाणे स्वच्छतादूत शिक्षकांचे एक दिवसाचे स्वच्छतादूत प्रशिक्षण घेण्यात यावे. व स्वच्छतादूत शिक्षकांच्या माध्यमातून सर्व शाळांमध्ये स्वच्छतादूताचे प्रशिक्षण आयोजन करण्यात यावे.

**४. ग्रामसभेचे आयोजन**

स्वच्छता उत्सवाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी प्रत्येक ग्रामपंचायतीमध्ये ग्रामसभेचे आयोजन करुन स्वच्छता उत्सवामध्ये उपक्रमांबाबत ग्रामस्थांना माहिती देण्यात यावी. तसेच गाव हागणदारीमुक्त करण्याचा संकल्प करण्यात यावा तसेच ग्रामपंचायतीस निर्मल ग्राम पुरस्कारास पात्र ठरविण्याच्या निकषांबाबत माहिती देण्यात यावी. जी गावे निर्मल ग्राम पुरस्कार प्राप्त झाला आहे त्यांनी गावे शाश्वत स्वच्छ ठेवण्यासाठी उपाययोजना करण्याचा निर्णय घेण्यात यावा. सर्व ग्रामस्थांना स्वच्छतेची शपथ देण्यात यावी.

**५. दि.१५ ऑक्टोबर, २०११ रोजी "हात धुवा" (Hand wash) मोहिमेचे आयोजन.**

या दिवशी सर्व ग्रामपंचायती, शाळा व अंगणवाडी यास्तरावर प्रभातफेरीचे आयोजन करुन प्रभातफेरीच्या समारोपाच्यावेळी शाळेत सर्व ग्रामस्थाच्या उपस्थितीमध्ये हात धुण्याच्या प्रात्यक्षिकाव्दारे त्याचे महत्व पटवून देण्यात यावे. तसेच या कार्यक्रमाची व्यापक प्रसिध्दी करण्यात यावी.

**६. ग्राम आरोग्य व पोषण दिवस साजरा करणे**

ग्रामस्तरावर दिनांक **१४ ऑक्टोबर २०११ रोजी ग्राम आरोग्य व पोषण दिवसाचे** आयोजन करण्यात यावे. यामध्ये आरोग्य विभाग व महिला व बालकल्याण विभागाच्या सहकार्याने आरोग्य व पोषण विषयक मार्गदर्शन करण्यासाठी प्राथमिक आरोग्य केंद्र स्तरावर महिला मेळाव्याचे आयोजन करण्यात यावे.

**७. गवंडी प्रशिक्षण कार्यक्रम**

स्वच्छता उत्सावा दरम्यान ज्या गावांमध्ये स्वच्छतेविषयक उत्साह आहे अशी मोठ्या लोकसंख्येची, बाजार पेठेची ठिकाणे निवडून त्याठिकाणी गवंडी प्रशिक्षाणाचे शासन परिपत्रक क्र. निर्मल २००८/ प्र.क्र. ७२/ पापु-१६, दि. २५ मार्च, २००८ अन्वये आयोजन करण्यात यावे. प्रशिक्षणादरम्यान एक गवंड्याने किमान एक शौचालय बांधकाम करणे आवश्यक आहे. गवंडी प्रशिक्षणात गवंड्याना वौयक्तिक शौचालय, बांधकाम, शाळा व अंगणवाडी स्वच्छतागृह बांधकामाचे प्रशिक्षण देण्यात यावे. गवंडी प्रशिक्षणाच्या माध्यमातून प्रशिक्षण आयोजित केलेल्या गावांमधील शाळा व अंगणवाडी स्वच्छतागृहाची आवश्यतेनुसार दुरुस्ती करण्यात यावी. ज्या गावांमध्ये प्रशिक्षणाचे आयोजन करण्यात येणार आहे. त्याठिकाणी प्रशिक्षणापुर्वी किमान २५ खड्डे खोदून ठेवलेले असावेत. तसेच आवश्यक साहित्याची उपलब्धता केलेली असावी. यापूर्वी प्रशिक्षित झालेल्या गवंडयांचा तालुकास्तरावर मेळावा घेऊन त्यांचाही या कालावधीमध्ये शौचालय बांधकामासाठी उपयोग करुन घेण्यात यावा.

**८. शासकीय कार्यलयामध्ये स्वच्छतागृहाची उपलब्धता व वापर**

जिल्हा व तालुकास्तरावरील शासकीय कार्यालयामध्ये उपलब्ध असलेल्या स्वच्छतागृहांबाबत विशेष सर्वेक्षण मोहिम राबविण्यात यावी. शासन परिपत्रक क्र. संस्वअ १००९/ प्र.क्र. १९७/ पापु-१६, दिनांक २३ फेब्रुवारी, २०११ अन्वये निश्चित करण्यात आलेल्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समितीची बैठक आयोजित करुन त्यामध्ये सर्वेक्षणामधून

उपलब्ध झालेल्या माहितीप्रमाणे सर्व शासकीय कार्यालयामध्ये वापरास योग्य स्वच्छतागृह उपलब्ध होण्याच्या दृष्टीने कृती आराखडा तयार करण्यात यावा.

**९. निर्मल बचत गट**

स्वच्छता उत्सवा दरम्यान ज्या बचत गटामधील सर्व सदस्याकडे शौचालयाची उपलब्धी होऊन त्याचा वापर होत आहे अशा बचत गटाचा तालुकास्तरावर सन्मानपत्र देऊन त्यांचा गौरव करण्यात यावा.

**१०. हागणदारीमुक्त गावाचा गौरव**

स्वच्छता उत्सवादरम्यान ज्या ग्रामपंचायती १००% हागणदारीमुक्त होतील त्या ग्रामपंचायतीचा गौरव दिनांक **२६ जानेवारी २०१२** रोजी मा. पालकमंत्री यांच्या हस्ते त्यांना गौरवपत्र देऊन सन्मानित करण्यात यावे.

**११. निर्मल शाळा व निर्मल महाविद्यालय**

स्वच्छता उत्सवा दरम्यान निर्मल शाळा व निर्मल महाविद्यालयासंदर्भातील शासन निर्णय क्र.निर्मल-१००९/प्र.क्र.१९१/पापु-१६, दिनांक २९ ऑगस्ट २००९ मध्ये नमुद केलेले निकष, तपासणी समिती व कार्यकालावधीत पात्र निर्मल शाळा व निर्मल महाविद्यालयांची निवड करण्यात यावी. दिनांक २६ जानेवारी २०१२ रोजी मा. पालकमंत्री यांच्या हस्ते त्यांना गौरवपत्र देऊन सन्मानित करण्यात यावे. -

**१२. कृती दलाची स्थापना**

ज्या ग्रामपंचायतीमध्ये अद्याप निर्मल कृती दल स्थापन करण्यात आले नाही, अशा सर्व ग्रामपंचायती मध्ये सरपंच, ग्रामपंचायतीचे सदस्य, ग्राम आरोग्य, पोषण आहार, पाणी पुरवठा, स्वच्छता व पर्यावरण समितीचे सदस्य, तंटामुक्त गाव समितीचे अध्यक्ष, अंगणावाडी सेविका, मुख्याध्यापक, महिला मंडळ, बचत गट, युवक मंडळ व स्थानिक संस्था व संघटनाचे प्रतिनिधी इत्यादीचा समावेश असणारे एक कृतीदल तयार करण्यात यावे. या कृती दलामार्फ़त गावामध्ये शौचालय नसलेल्या कुटुंबांना सातत्याने भेटी देऊन त्याना शौचालय बांधण्यासाठी प्रवृत्त करावे. गाव पातळीवरील जाणीव जागृतीचे कार्यक्रमाचे आयोजन ग्रामपंचायतींच्या समन्वयातून करण्यात यावे.

**१३. वैयक्तीक स्वच्छतागृह:**

स्वच्छता उत्सव कालावधीमध्ये वैयक्तीक स्वच्छतागृहांचे बांधकाम होण्याच्या उद्देशाने **कुटुंबसंपर्क अभियान** राबविण्यात यावे. यामध्ये गावामधील निर्मल कृतीदल सदस्य, अंगणवाडी

कार्यकर्ती, बचतगट सदस्य, स्वच्छता दूत यांचा सहभाग घेण्यात यावा. मोठ्याप्रमाणात वैयक्तिक शौचालय बांधकाम होईल यासाठी प्रयत्न करण्यात यावा.

**१४. सार्वजनिक स्वच्छतागृह:**

प्रकल्प अंमलबजावणी आराखडयामधील मंजूर सार्वजनिक स्वच्छतागृहांचे बाजारांची गावे, तालुका मुख्यालय ग्रामपंचायत, यात्रास्थळे, धार्मिक स्थळे आदी ठिकाणी जिल्ह्याच्या सन २०११-१२ च्या वार्षिक कृती आराखडयानुसार मंजूरी देऊन व बांधकामाचा प्रारंभ करण्यात यावा.

जिल्ह्यामध्ये ग्रामपंचायत स्तरावर उपलब्ध असलेल्या विविध योजनांतर्गत घेण्यात आलेल्या सार्वजनिक स्वच्छतागृहांचे सर्वेक्षण व निधीच्या उपलब्धतेनुसार देखभाल दुरुस्ती बाबत नियोजन करण्यात यावे.

**१५. शाळा स्वच्छतागृह:**

सर्व शिक्षा अभियान कक्षाशी समन्वय साधून ग्रामपंचायतनिहाय उपलब्ध असलेल्या शाळांची व स्वच्छतागृहांच्या उपलब्धतेची माहिती एकत्रित करण्यात यावी. शाळांमध्ये मुले व मुली यांच्यासाठी स्वतंत्र स्वच्छतागृहांची उपलब्धता होण्याच्या दृष्टीने सर्वेक्षण करुन गरज निश्चित करण्यात यावी. तसेच शिक्षक पालक संघाच्या बैठका घेण्यात याव्यात.

यापुर्वी शाळा वृध्दी मोहिमेबाबत शासन परिपत्रकानुसार जिल्ह्यामधील सर्व शाळांमधील मुला-मुलींसाठी असलेल्या स्वतंत्र स्वच्छतागृहे उपलब्ध करुन देण्यात यावीत. तसेच आस्तित्वातील शौचालयासाठी सर्व शिक्षा अभियानांतर्गत उपलब्ध निधीमधून देखभाल व दुरुस्तीचा आराखडा तयार करुन आवश्यकतेनुसार अंमलबजावणी करण्यात यावी. शाळा स्वच्छतागृहांच्या वापराबाबत विशेष मोहिम हाती घेण्यात यावी. शाळांमध्ये पिण्याच्या पाण्याच्या सुविधा उपलब्ध झाल्याची खात्री करण्यात यावी.

**१६. अंगणवाडी स्वच्छतागृह:**

स्वतंत्र इमारती उपलब्ध असलेल्या अंगणवाडयांसाठी स्वच्छतागृहांच्या उपलब्धतेबाबत सर्वेक्षण करुन आवश्यक असल्यास गरज निश्चित करण्यात यावी. नादुरुस्त अंगणवाडी स्वच्छतागृहांच्या दुरुस्तीसाठी राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य मिशनच्या उपलब्ध निधीचा वापर करावा. अंगणवाडी स्वच्छतागृहांच्या वापराबाबत विशेष मोहिम हाती घेण्यात यावी. संपूर्ण स्वच्छता अभियानातंर्गत शिल्लक असलेले उद्दिष्ट १०० % साध्य होईल यासाठी प्रयत्न करण्यात यावा.

**१७. घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापन:**

जिल्ह्यामध्ये वैयक्तीक (घरगुती) स्तरावर घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापनाबाबत मागणी निर्माण करण्याकरीता व्यापक जनजागृती करण्यात यावी. तसेच सन २०११-१२ करीता निवडलेल्या ग्रामपंचायतीमधील PRA, सर्वेक्षण, आराखडे व अंदाजपत्रके बनविणे याबाबत कार्यवाही पुर्ण करण्यात यावी आणि निवडलेल्या ग्रामपंचायतींचे पदाधिकारी, ग्रामसेवक तसेच विस्तार अधिकारी, शाखा अभियंता, कनिष्ठ अभिंयता यांचे प्रशिक्षण व क्षमता बांधणी कार्यक्रम घेण्यात यावेत.

**१८. कलापथक, फिल्म शोज् दाखविणे:**

सन २०११-१२ च्या वार्षिक कृती आराखडयानुसार ग्रामपंचायतींच्या गरजेनुसार कलापथक, फिल्म शो, पथनाट्य यांचे गांवनिहाय नियोजन करुन अंमलबजावणी करण्यात यावी. गावांमध्ये किर्तनकाराच्या माध्यमातून स्वच्छतेविषयक जनजागृती करण्यात यावी. तसेच स्वच्छतामित्र वक्तृत्व स्पर्धेत तालुकास्तरावर प्रथम व व्दितीय पुरस्कार प्राप्त करणा-या विद्यार्थ्यांना साधन व्यक्ती म्हणून उपयोग करण्यात यावा.

**१९. जनजागृती करणे**

स्वच्छता उत्सवादरम्यान स्वच्छतेविषयक जनजागृती व्यापक प्रमाणात व्हावी यासाठी राज्यस्तरावरुन स्टीकरचे डिजाईन देण्यात येईल व त्यानुसार स्टिकर तयार करुन घेण्यात यावे तयार केलेले स्टिकर हे उत्सवापुर्वी गाव पातळीवर पोहचतील याची खात्री करावी. आकाशवाणीवर जिंगल्स, स्पॉट,प्रसारीत करावेत व परिसंवादा आयोजन करण्यात यावेत. बसस्टँन्ड मध्ये स्वच्छता उत्सवाबाबत अनाउन्समेंट जिंगल्स, स्पॉट प्रसारित करण्यात यावे.

**२०. समन्वय व संपर्क**

प्रत्येक ग्रामपंचायतीच्या समन्वयासाठी प्रत्येक ग्रामपंचायतीसाठी संपर्क अधिका-याची निवड करण्यात यावी. तसेच तालुकास्तरावर विस्तार अधिकारी पंचायत यांना समन्वयाचे काम देण्यात यावे.

सदर उपक्रमांवर होणारा खर्च संपुर्ण स्वच्छता अभियानांतर्गत माहिती, शिक्षण व संवाद ( आय.ई.सी. ) या घटकांतर्गत उपलब्ध निधीतुन करण्यात यावा. परंतु, यासाठी खर्च करताना, आयईसीचा खर्च संपूर्ण स्वच्छता अभियााच्या आयईसीसाठी अनुज्ञेय असलेल्या निधीच्या मर्यादेतच राहील याची दक्षता जिल्हा परिषदांनी घ्यावी.

वरील प्रमाणे उपक्रमांचे आयोजन जिल्ह्यामध्ये करुन त्याबाबतचा अहवाल शासन मार्फत देण्यात येणा-या प्रपत्रामध्ये **दिनांक २० ऑक्टोबर व १० नोव्हेबर २०११** रोजी सादर करण्यात यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आलेले असुन त्याचा संगणक सांकेताक २०११०९२६१५२३००००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सही/-**
**( सुधीर ठाकरे )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,
१) मा. राज्यपाल महोदयांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
४) सर्व मा. मंत्री महोदयांचे खाजगी सचिव
५) सर्व मा. राज्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव
६) सर्व संसद सदस्य.
७) विधानसभा व विधान परिषदेचे सर्व सदस्य.
८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय.
९) विभागीय आयुक्त, सर्व.
१०) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सर्व.
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व. यांना विनंती की त्यांनी सदर आदेश सर्व ग्रामपंचायतींच्या निदर्शनास आणावेत.
१२) उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत), जिल्हा परिषद, सर्व.
१३) संचालक, पाणी पुरवठा, स्वच्छता व सहाय्य संस्था, बेलापुर.
१४) राज्य समन्वयक, संवाद व क्षमता विकास कक्ष, बेलापूर.
१५) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) पाणी पुरवठा विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व सर्व कार्यासने.
१८) निवड नस्ती, पापु-१६.